उस्मानाबाद जिल्हयातील उस्मानाबाद मुख्यालय, उमरगा व तुळजापूर तालुक्याकरिता नोटरी नियुक्तीसाठी अर्ज मागविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः २६८-२०१७/नोटरी/ई शाखा**
पाचवा मजला (मुख्य), मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: २८ जून, २०१७

**शासन परिपत्रक**

**उस्मानाबाद** जिल्हयातील निम्नलिखित तालुक्याच्या ठिकाणी नोटरी अधिनियम, १९५२ व त्याखालील नोटरी नियम,१९५६ नुसार नोटरींच्या नेमणूका करण्याकरिता, नोटरी नियम, १९५६ अन्वये नियम ३ मध्ये विहित पात्रताधारक उमेदवारांकडून सदर नियमांचे नियम ४ मध्ये विहित पध्दतीने व नमुन्यात अर्ज (फॉर्म I किंवा फॉर्म II ); सक्षम प्राधिकारी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेमार्फत मागविण्यात येत आहेत. सदर उमेदवारांनी नोटरी नियमामध्ये विहित केलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त तालुक्याचा अधिवासी असल्याचे प्रमाणपत्र (डोमिसाईल सर्टीफिकेट); शिधापत्रिकेची प्रमाणित प्रत (रेशनकार्ड) अथवा आधार कार्ड; तालुका वकील संघाच्या अध्यक्ष/सचिव यांचे, अर्जदार त्या वकील संघाचा सदस्य असल्याबाबतचे प्रमाणपत्र; आयकराबाबत पॅन नंबर असल्यास पॅनकार्डची प्रत विहित नमुन्यातील अर्जाबरोबर जोडणे आवश्यक आहे. तसेच अर्जावर फोटो चिकटवणे आवश्यक आहे.

सदर परिपत्रकानुसार ज्या पात्र उमेदवारांनी / अर्जदारांनी यापूर्वी शासनाकडे स्वत:हून अर्ज पाठविले होते, त्यांनी पुन्हा नव्याने अर्ज करावयाचा आहे. पूर्वी दिलेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

सर्व पात्र उमेदवारांनी आपले अर्ज विहित नमुन्यात फक्त रजिस्टर पोस्टाने/स्पीड पोस्टाने खाली सही करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यांच्या नांवे पाठविण्यात यावेत. तसेच अर्जाच्या पाकिटावर **"........ जिल्हयातील ........तालुक्यातील नोटरीच्या पदाकरिता अर्ज"** असे ठळक अक्षरात नमूद करावे. परिपूर्ण अर्ज सदर कार्यालयात दि. **११ ऑगस्ट, २०१७** तारखेपर्यंत कार्यालयीन वेळेत मिळतील असे पाठवावेत. हया तारखेनंतर कार्यालयात प्राप्त झालेले अर्ज तसेच विहित नमुन्यात नसलेले, फोटो न चिकटवलेले व संपूर्ण कागदपत्रे न जोडलेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०६२८१७२५०४१७१२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

| जिल्हा | तालुक्याचे नांव | नोटरींच्या पदांची संख्या |
|---|---|---|
| उस्मानाबाद | उस्मानाबाद मुख्यालय | २ |
| | उमरगा | १ |
| | तुळजापूर | १ |

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, cn=Rajendra D Sawant
Date: 2017.06.28 17:21:19 +05'30'

(राजेंद्र सावंत)
विधि सल्लागार-नि-सह सचिव
तथा सक्षम प्राधिकारी